**"National Mission for Safety of Women" अंतर्गत महिलांवरील बलात्काराची व POCSO कायद्यांतर्गत बालकांवरील अत्याचाराची प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्यासाठी स्थापन राज्यातील १३८ विशेष जलदगती न्यायालयांकरीता पदनिर्मिती करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: जगन्या १४१९/५/प्र.क्र.४/का- नऊ**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक:- ०९ मार्च, २०२३.

**वाचा:-**
१. केंद्र शासनाचे पत्र क्र. D.O. No. १५०११/१४/२०१८- JUS-II, न्याय विभाग, विधि व न्याय मंत्रालय, नवी दिल्ली दि.०५.०९.२०१९.
२. मा. उच्च न्यायालयाचे पत्र क्र. B(W)A-२१०८ of २०१९ /३३९/५८२८, दि.१५.०२.२०२०.
३. विधि व न्याय विभाग, समक्रमांकाचा शासन निर्णय, दि.०४.०३.२०२०.
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. D.O. No. १५०११/१४/२०१८- JUS-II/५५४४, न्याय विभाग, विधि व न्याय मंत्रालय, नवी दिल्ली दि.०४.०६.२०२१.
५. विधि व न्याय विभाग, समक्रमांकांचे शासन निर्णय, दि.०८.०३.२०२१.
६. विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. जगन्या १४१९/५/प्र.क्र.४(अ)/का- नऊ, दि.०८.०३.२०२१.
७. विधि व न्याय विभाग, समक्रमांकांचे शासन निर्णय, दि.२९.०६.२०२१,दि.१४.०७.२०२१ व दि.१२.०८.२०२१.
८. मा. उच्च न्यायालयाचे पत्र क्र. A(Spl)/FTC/२०२२/१०३/२०२२, दि.३१.०५.२०२२ व पत्र क्र. B(W)A-२१०८ of २०१९ /१२२०/१९१६९, दि.१६.०६.२०२२.
९. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. १३.१२.२०२२ रोजी झालेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने "National Mission for Safety of Women" अंतर्गत महिला व बालके अंतर्भूत असलेली बलात्कार व पॉक्सो कायद्यांतर्गतची प्रलंबित प्रकरणे चालवून त्वरीत निकाली काढण्यासाठी विशेष जलदगती न्यायालये स्थापनेबाबतची तरतूद केली आहे. सदर अभियानाच्या कृती आराखड्यानुसार राज्यात १३८ विशेष जलदगती न्यायालये (FTSCs) स्थापन करण्याचे प्रस्तावित करण्यात आले होते. यानुषंगाने संदर्भ क्र.२ येथील मा. उच्च न्यायालयाच्या प्रस्तावास अनुसरून, संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये, "National Mission for Safety of Women अंतर्गत महिला व बालके अंतर्भूत असलेली बलात्कार व पॉक्सो (POCSO) कायद्यांतर्गतची प्रलंबित प्रकरणे चालवून त्वरीत निकाली काढण्यासाठी महाराष्ट्र राज्यात १ वर्षाच्या कालावधीकरीता १३८ विशेष जलदगती न्यायालये (FTSCs) स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली होती. तदनंतर संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये केंद्र शासनाकडून प्राप्त सूचनांनुसार संदर्भ क्र.७ येथील शासन निर्णयांन्वये १३८ विशेष जलदगती न्यायालयांना दि.३१.०३.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

विशेष जलदगती न्यायालयांमध्ये सेवानिवृत्त न्यायिक अधिकारी उपलब्ध न होणे, तसेच नियुक्ती देण्यात आलेल्या न्यायिक अधिकाऱ्यांच्या राजीनाम्यामुळे न्यायालयांचे कार्यान्वित होण्याचे अल्प प्रमाण लक्षात घेता, नियमित न्यायिक अधिकारी नियुक्त करून विशेष जलदगती न्यायालये कार्यान्वित करण्याबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी संदर्भ क्र.८ येथील पत्रान्वये प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

प्रस्तावांतर्गत खर्चास वित्त विभागाने सहमती दर्शवली असून, सदर न्यायालयांकरीता आवश्यक पदनिर्मीतीच्या प्रस्तावास मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. १३.१२.२०२२ रोजी झालेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार १३८ विशेष जलदगती न्यायालयांकरीता पदनिर्मीतीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

"National Mission for Safety of Women" अंतर्गत महिलांवरील बलात्काराची व POCSO कायद्यांतर्गत बालकांवरील अत्याचाराची प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्यासाठी संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या प्रत्येक विशेष जलदगती न्यायालयासाठी न्यायाधीशांच्या पदासह सहाय्यभूत कर्मचा-यांची एकूण ३ नियमित पदे व ५ बाह्ययंत्रणेचे मनुष्यबळ याप्रमाणे, १३८ विशेष जलदगती न्यायालयांकरीता एकूण ४१४ नियमित पदे निर्माण करण्यास व एकूण ६९० मनुष्यबळाच्या मर्यादेत बाह्ययंत्रणेकडून सेवा घेण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. यानुषंगाने पदांचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-

**(अ) मुंबई बाहेरील ११२ विशेष जलदगती न्यायालयांसाठी**

**(अ) (१) नियमित पदे**

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतनस्तर | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश | J-५ : (१४४८४०-१९४६६०) (न्यायिक वेतन आयोगाप्रमाणे) | १ |
| २. | लघुलेखक (ग्रेड-१) | S-१७ : (४७६००-१५११००) | १ |
| ३. | अधीक्षक | S-१६ : (४४९००-१४२४००) | १ |
| | **एकूण** | | **३** |
| | **एकूण ११२ विशेष न्यायालयांसाठी (११२x३)** | | **३३६** |

**(अ) (२) बाह्ययंत्रणेकडून घ्यावयाच्या सेवा**

| अ.क्र. | सेवा | मनुष्यबळ |
|---|---|---|
| १. | लिपिक टंकलेखक | ३ |
| २. | बहुउद्देशिय गट-ड कर्मचारी (शिपाई इ.) | २ |
| | **एकूण** | **५** |
| | **एकूण ११२ विशेष न्यायालयांसाठी (११२x५)** | **५६०** |

## (आ) मुंबईमधील २६ विशेष जलदगती न्यायालयांसाठी

### (आ) (१) नियमित पदे

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतनस्तर | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | न्यायाधीश | J-५ : (१४४८४०-१९४६६०)<br>(न्यायिक वेतन आयोगाप्रमाणे) | १ |
| २. | लघुलेखक (ग्रेड-१) | S-१७ : (४७६००-१५११००) | १ |
| ३. | शिरस्तेदार | S-१४ : (३८६००-१२२८००) | १ |
| | **एकूण** | | **३** |
| | **एकूण २६ विशेष न्यायालयांसाठी (२६x३)** | | **७८** |

### (आ) (२) बाह्ययंत्रणेकडून घ्यावयाच्या सेवा

| अ.क्र. | सेवा | मनुष्यबळ |
|---|---|---|
| १. | लिपिक टंकलेखक | १ |
| २. | बहुउद्देशिय गट-ड कर्मचारी (शिपाई इ.) | ३ |
| ३. | दुभाषी | १ |
| | **एकूण** | **५** |
| | **एकूण २६ विशेष न्यायालयांसाठी (२६x५)** | **१३०** |

### (क) संक्षिप्त तपशिल

(अ)+(आ)

| | नियमित पदे | बाह्ययंत्रणेकडून घ्यावयाच्या सेवा | एकूण |
|---|---|---|---|
| **मुंबईबाहेरील ११२ विशेष न्यायालयांसाठी** | ३३६ | ५६० | **८९६** |
| **मुंबईमधील २६ विशेष न्यायालयांसाठी** | ७८ | १३० | **२०८** |
| **एकूण** | **४१४** | **६९०** | **११०४** |

३. उपरोक्त अस्थायी पदे दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास शासन मंजुरी देण्यात येत असून, सदर अस्थायी पदांना दिनांक ३१.०८.२०२३ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

४. सद्यस्थितीत सेवानिवृत्त न्यायिक अधिकारी व कर्मचारी यांच्यासह कार्यरत असलेली विशेष जलदगती न्यायालये सदर १३८ विशेष जलदगती न्यायालयांमध्ये उपरोक्त नमूद केलेल्या पदांप्रमाणे नियमित न्यायाधीशांची नियुक्ती होईपर्यंत चालू ठेवण्यात यावीत.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-१, २०१४- न्यायदान, १०२ उच्च न्यायालये, १४- महिलांच्या सुरक्षिततेसाठी राष्ट्रीय उपक्रम अंतर्गत विशेष न्यायालयाची स्थापना, (१४)(०१) महिला व बालक अंतर्भूत प्रकरणे त्वरीत निकालात काढण्यासाठी विशेष न्यायालयाची स्थापना (कार्यक्रमांतर्गत) (दत्तमत) (केंद्र हिस्सा ६०%) (२०१४ ०६६४) व (१४) (०२) महिला व बालक अंतर्भूत प्रकरणे त्वरीत निकालात काढण्यासाठी विशेष न्यायालयाची स्थापना (कार्यक्रमांतर्गत) (दत्तमत) (राज्य हिस्सा ४०%) (२०१४ ०६७३) या लेखाशीर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अ.नौ.स.क्र.११/१४४३, दि.११.०१.२०२३, तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ अ.नौ.सं.क्र.६३/व्यय-५, दि.१८.०१.२०२३ व अ.नौ.सं.क्र.६६७/आपुक, दि.२५.११.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०३०९१८३४२९६११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.03.09 18:40:40 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. विरोधी पक्ष नेता विधान सभा /विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
६. प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
७. सर्व प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालये,
८. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा / मुळ शाखा), मुंबई,
९. प्रबंधक, उच्च न्यायालय, नागपूर/औरंगाबाद खंडपीठ,
१०. संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,
११. सह संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर,
१२. सह संचालक, महाराष्ट्र न्यायिक अकादमी, उत्तन,
१३. महालेखापाल- एक (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई,
१४. महालेखापाल- दोन (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर,
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१७. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे,
१८. वित्त विभाग, व्यय-५/ अर्थ-११/आपुक, मंत्रालय, मुंबई,
१९. नियोजन विभाग, का.१४४३, मंत्रालय, मुंबई,
२०. विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने,
२१. निवड नस्ती/ कार्या.९.